# प्रस्तावना

कुटुंब न्यायालयासंबंधीचा कायदा १९८४ मध्ये संमत झाला. त्या आधारे महाराष्ट्रात फॅमिली कोर्टस् नियमावली १९८८ मध्ये तयार केली. पहिले कुटुंब न्यायालय १९८९ साली महाराष्ट्रात पुणे येथे सुरु झाले.

हे कौटुंबिक न्यायालय सुरु करण्याची आवश्यकता का निर्माण झाली? इतर न्यायालयांपेक्षा या न्यायालयाचे वेगळेपण कोणते? इथे कुटुंबाशी संबंधित म्हणजे नेमके कोणत्या स्वरुपाचे खटले चालतात? ते कसे चालतात? कोणातर्फे चालवले जातात? असे अनेक प्रश्न सामान्य माणसाच्या मनात निर्माण होतात.

या आणि अशाच अनेक शंकांचे निरसन करण्यासाठी ही माहिती पुस्तिका निश्चितच उपयुक्त ठरणारी आहे. ह्या पुस्तिकेत कायद्यासंबंधी माहिती नाही, कारण हे कायद्याचं पुस्तक नाही. परंतु फायद्याचं निश्चितच आहे. कुटुंबातील व्यक्तिंच्या समस्या या न्यायालयात सोडविण्याचा प्रयत्न केला जातो. मग ती व्यक्ती आई, वडील, पत्नी, पती अथवा मूल कुणीही असो.

ही समस्या घरगुती वातावरणात मनावर कोणत्याही प्रकारचे दडपण न ठेवता कशी सोडविता येते तसेच आर्थिक, शारीरिक, मानसिक आणि शैक्षणिक दृष्ट्या मागासलेल्या व्यक्तीलाही इथे कसा प्रवेश मिळू शकतो याचे मुद्देसूद विवेचन या पुस्तिकेत आहे.

मुंबई इथे कुटुंब न्यायालय सुरु झाल्यापासून विवाह समुपदेशाचे काम मी करत होते. ही पुस्तिका कुटुंब न्यायालयाची सांगोपांग तोंडओळख करुन देणारी ठरावी अशी आशा आहे.

डॉ.सुजाता चव्हाण.

## कुटुंब न्यायालयाची उद्दिष्टे

"कुटुंब न्यायालय कायदा" हा १४ सप्टेंबर १९८४ रोजी अंमलात आला व यानुसार कुटुंब न्यायालयाची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्रात पुणे येथे २६ जानेवारी १९८९ रोजी पहिले कुटुंब न्यायालय सुरु झाले. यानंतर मुंबई येथे ७ ऑक्टोबर १९८९ रोजी कुटुंब न्यायालय सुरु करण्यात आले. त्यानंतर औरंगाबाद, नागपूर, अकोला, अमरावती, ठाणे, नांदेड, सोलापूर, नासिक, कोल्हापूर ह्या ठिकाणी कुटुंब न्यायालये सुरु करण्यात आलेली आहेत. ह्या न्यायालयात विवाहाशी संलग्न अशा कौटुंबिक बाबींवर निर्णय दिले जातात. दहा लाखांहून अधिक लोकवस्ती असलेल्या शहरात कुटुंब न्यायालय चालू करावे अशी कौटुंबिक न्यायालय कायद्यात तरतूद आहे.

कौटुंबिक प्रश्न हा वैयक्तिक स्वरुपाचा असून दोन कुटुंबांचा ह्यात समावेश असतो. ह्या समस्या अत्यंत नाजूक व गुंतागुंतीच्या असतात. अशा समस्या सोडविण्यास विलंब होऊ नये व तसेच वैयक्तिक पातळीवर ह्या समस्यांचा विचार करुन त्या सामंजस्याने सोडविल्या जाव्यात याकरिता कुटुंब न्यायालय स्थापन करण्यात आले. कुटुंब न्यायालयाचे प्रमुख उद्दिष्ट लग्नसंस्था टिकविणे हे असून संसार मोडू नये म्हणून कुटुंब न्यायालयात सर्वतोपरी प्रयत्न केले जातात. तथापि, हे शक्य नसेल तर उभयपक्षी समझोता घडवून भांडण–तंटा न करता वाद मिटविणे शक्य आहे का ह्यावर विचार विनिमय केला जातो.

कुटुंब न्यायालयात कोणकोणत्या प्रकारचे अर्ज दाखल करता येतात?

- विवाह घटनाबाह्य किंवा रद्दबातल ठरविणे (Nullity of Marriage)
- विवाह हक्क प्रतिस्थापन (Restitution of conjugal rights)
- कायदेशीर विभक्तता (Judicial Separation)
- विवाह विच्छेद (Divorce)
- कोणत्याही व्यक्तीचा वैवाहिक दर्जा ठरविण्यासंबंधीचे खटले (Declaration of Marital Status of any person)
- विवाह नात्याने निर्माण झालेल्या मालमत्तेच्या संबंधीचे खटले (Matrimonial Property Matters)
- पोटगी संबंधीचे दावे (Claim of Maintenance)

  (अ) बायकोचा नवऱ्याविरुद्ध पोटगीसाठीचा दावा
  (ब) आई/वडिलांचा मुलाविरुद्ध पोटगीसाठी दावा
  (क) मुला/मुलीचा वडिलांविरुद्ध पोटगीचा दावा

- पालकत्व नक्की करण्याबाबतचे अर्ज (Guardianship)
- मुला/मुलींच्या ताब्यासंबंधीचे अर्ज (Custody of Children)
- मुला/मुलींना भेटण्यासंबंधीचे अर्ज (Access of Children)

- विवाहसंबंधीचे इतर दावे, उदा. प्रतिबंध घालण्यासाठी अर्ज (Application for injunction in Matrimonial matters)

मुंबई येथील कुटुंब न्यायालय वांद्रे येथे आहे.

न्यायालयाचा पत्ता:
कुटुंब न्यायालय
ॲडमिनिस्ट्रेटिव्ह बिल्डींग–ब,
वांद्रे–कुर्ला कॉम्पेक्स,
वांद्रे (पूर्व),
मुंबई ४०० ०५१.

मुंबई येथे एकूण सात कुटुंब न्यायालये असून सात न्यायाधीश व चौदा विवाह समुपदेशक त्यांचे काम पहातात.

ह्या न्यायालयात खटले दाखल करण्याची वकिलांना परवानगी आहे. परंतु खटला दाखल केल्यानंतर मात्र वकिलांना खटला चालविण्याची कायद्यानुसार परवानगी नाही. न्यायधिशांची विशेष परवानगी घेऊनच वकिल कोर्टात उभे राहू शकतात. ह्यासंबंधी मुंबईच्या उच्च न्यायालयातर्फे काही मार्गदर्शक तत्त्वे निश्चित करण्यात आली आहेत. ती मार्गदर्शक तत्त्वे अशी:

## मार्गदर्शक तत्त्वे:

(१) प्रथमत: पक्षकाराकडून त्यांच्या दाव्यासाठी वकिलांची मदत आवश्यक आहे का व असल्यास त्याची कारणे कोणती ह्याची विचारपूस न्यायाधीश करतात.

(२) पक्षकारांच्या स्थितीनुसार, उदा. शिक्षण, वय इत्यादीवरुन ती व्यक्ती आपला दावा चालवू शकेल का ह्याचा न्यायाधीश विचार करतात.

(३) त्याचप्रमाणे त्या व्यक्तीचा व्यवसाय, त्याची आर्थिक स्थिती, राहण्याचे ठिकाण ह्यानुसार त्या व्यक्तीस दाव्यासाठी नेहमी कोर्टात हजर राहणे शक्य होईल का ह्याचा विचार करुन वकिलांना परवानगी देता येते.

(४) जर एखादा दावा गुंतागुंतीचा असेल, त्या दाव्यात वेगवेगळ्या तज्ज्ञांची मदत लागण्याची शक्यता दिसत असेल व त्याकरिता दावा चालविण्यासाठी वकिलांची गरज भासत असेल तर न्यायाधीश वकिलांना परवानगी देतात.

(५) जर दोन्ही पक्षांमध्ये (वादी व प्रतिवादी) खूप तफावत असली व न्यायाधिशांना वाटले की एक पक्ष दुसऱ्याचा अवाजवी फायदा घेण्याची शक्यता आहे तर अशा दाव्यांमध्ये वकिलांना परवानगी दिली जाते.

(६) काही दाव्यांमध्ये, उदा. दोघांच्या संमतीने दाखल केलेला दावा किंवा ज्या दाव्यात फारसे साक्षी–पुरावे लागणारे नसतात असे दावे, दोघांची संमती ही स्वखुशीने आहे की नाही किंवा एका पक्षाचा दुसरा पक्षकार फायदा तर घेत नाही ना, अशा तऱ्हेची शंका असल्यास ती दूर करण्याकरिता वकिलांना परवानगी देता येते. शिवाय काही वेळा पक्षकाराने घेतलेल्या निर्णयाचा कायदेशीर परिणाम काय होणार ह्याची त्याला जाणीव करुन देणे जरुरीचे असते. त्याकरिता सुद्धा वकिलांना परवानगी दिली जाऊ शकते.

(७) कौटुंबिक समस्यांवरचा दावा चालविताना पक्षकार भावनांच्या आहारी जाण्याची शक्यता जास्त असते त्यामुळे त्यांना आपला दावा नीट चालविणे कधी कधी अशक्य होते. शिवाय त्यांना दिलेल्या वेळात आपली सर्व बाजू मुद्देसूदपणे मांडणे शक्य असतेच असे नाही. अशा परिस्थितीत वकिल असणे योग्य ठरते.

न्यायाधीश वरील सर्व गोष्टीचा विचार करुन वकिलांना परवानगी देतात किंवा नाकारतात. त्यांनी परवानगी नाकारल्यास त्याचे कारण ते नमूद करतात.

## कुटुंब न्यायालयाचे विभाग

मुंबई कुटुंब न्यायालयाची मर्यादा ही मुंबई शहरापुरतीच मर्यादित आहे. येथे दावा दाखल करावयाचा असल्यास:

(१) पक्षकारांचे लग्न मुंबईत झालेले असावे, किंवा
(२) दोघेही शेवटी मुंबईतच पती–पत्नी या नात्याने राहिलेले असावेत, किंवा
(३) प्रतिवादी मुंबईत राहणारा असावा, किंवा
(४) एक पक्ष भारताबाहेर राहणारा असावा.

कुटुंब न्यायालयाचे कामकाज पहाण्यासाठी पुढीलप्रमाणे वेगवगळे विभाग आहेत:

(१) विवाह समुपदेशकांचा विभाग (Office of Marriage Counsellor)

(२) न्यायिक कक्ष (Judiciary Department)

(३) लेखा विभाग (Accounts Department)

(४) नक्कल विभाग (Certified Copy Section & Decree Department)

(५) ग्रंथालय (Library)

(६) मुलांचे संकुल (Children's Complex)

(७) वकिलांचा विभाग (Bar-Room)

(८) समस्या निवारण मध्यस्थी केंद्र (Alternative Dispute Resolution)

ह्या सर्व विभागांचे कामकाज प्रमुख न्यायाधिशांच्या देखरेखीखाली चालते. येथे विवाहासंबंधीच्या दाव्यांसाठी कोर्ट फी स्टँप लावावे लागतात. वेगवेगळ्या दाव्यांसाठी वेगवेगळ्या रकमेचे स्टँप्स लावणे जरुरीचे असते. स्त्रियांना कोर्ट फी माफ असल्याने त्यांना स्टँप फी लावावी लागत नाही. पोटगीच्या काही दाव्यांना पाच रु.चे स्टँप लागतात. पक्षकारांनी आपला दावा करताना योग्य किंमतीचे कोर्ट फी स्टँप्स लावणे जरुरीचे असते.

## कामकाज कसे चालते?

दावा दाखल करण्यासाठी कुटुंब न्यायालयात पक्षकार स्वतः दावा दाखल करु शकतात. त्यांच्या मदतीसाठी कोर्टात ड्राफ्टर्स असतात, जेणे करुन कमीत कमी खर्चात दावा दाखल करणे शक्य होते. पक्षकाराने खटला दाखल केल्यानंतर त्या व्यक्तीस एक नंबर दिला जातो व काही दिवसांनंतरची तारीख सांगण्यात येते. या दिवसांच्या कालावधीत त्या दाव्याची (अर्जाची) छाननी केली जाते. दाव्यात कायद्यानुसार काही उणिवा नाहीत ना ह्याची पहाणी होते. जर अर्जात काही त्रुटी नसल्या तर त्यास दाव्याचा नंबर दिला जातो. अर्जाची एक प्रत दुसऱ्या पक्षाला (प्रतिवादीला) पाठविली जाते. प्रतिवादीला पाठविली जाणारी प्रत ही पोस्टातर्फे पाठविली जाते. जर पोस्टाने पाठविलेली प्रत घेतली नाही किंवा पोहचली नाही किंवा जर पक्षकाराला तात्काळ काही कारवाई करावयाची गरज असेल तर कोर्टाच्या बेलिफामार्फत ती पाठविली जाते. कोर्टाच्या बेलिफाबरोबर पक्षकाराकडील एका व्यक्तीची हजेरी आवश्यक असते. कारण ही व्यक्ती प्रतिवादीला ओळखून दाखवू शकते.

कोर्टाची तारीख दिल्यानंतर त्या तारखेस दोन्ही पक्षांनी त्यांना नेमून दिलेल्या कोर्टात दिलेल्या वेळी हजर रहावयाचे असते. कोर्टातून दोन्ही पक्षांना विवाह समुपदेशकाकडे पाठविण्यात येते.

हे दावे समन्वयाने मिटविणे तसेच लग्नसंस्था टिकविणे हे ह्या न्यायालयाचे उद्दिष्ट आहे. यादृष्टीने सर्वतोपरी प्रयत्न केले जातात. विवाह समुपदेशक दोन्ही पक्षांशी स्वतंत्रपणे बोलतात. दोन्ही पक्षांना आपली बाजू मांडण्यास वेळ दिला जातो. प्रथम दोघांशी स्वतंत्रपणे व नंतर एकत्रितपणे बोलणी केली जातात. त्यांचे म्हणणे शांतपणे ऐकून घेतले जाते. त्यांची समस्या समजावून घेणे आवश्यक असते. विवाह समस्या ही फक्त दोघांमध्ये न राहता दोन कुटुंबांचा त्यात समावेश असतो. ह्यासाठी दोन्ही पक्षांच्या कुटुंबियांशी, त्यांच्या नातेवाईकांशीसुद्धा बोलणे केले जाते. ह्या सर्व भेटींमधून समस्या समजावून घेऊन त्याची दोन्ही पक्षांना जाणीव करुन देऊन, त्याची कारणे कोणती ह्याचा विचार

करुन त्यावर उपाय काय करता येईल ह्याची चर्चा केली जाते. वेगवेगळे पर्यायी उपाय दोन्ही पक्षांपुढे मांडण्यात येतात. त्याचे परिणाम काय होतील ह्याची माहिती दोघांनाही करुन देण्यात येते. प्रत्येकाने आपला निर्णय हा स्वत: घ्यायचा असतो. पक्षकारांना वेगवेगळे पर्याय व त्याचे परिणाम याबद्दलची माहिती करुन दिल्यावर त्यांनी आपला निर्णय स्वत: घ्यायचा असतो. त्यांच्या निर्णयानुसार पुढे त्यांना त्याच्या अंमलबजावणीसाठी मदत केली जाते.

जर दोघांनी एकत्र रहावयाचे ठरविले असेल तर त्यादृष्टीने दोघांशी बोलणे करुन कागदपत्रे तयार केली जातात. दोघेही एकत्र राहिल्यानंतर दर महिन्याला विवाह समुपदेशक त्यांच्याशी गाठभेट घेत असतात. काही समस्या अजूनही राहिल्या असल्यास त्याचा विचारविनिमय केला जातो. अशाप्रकारे एकत्र राहण्याने त्यांच्या मूळ अर्जावर कोणत्याही प्रकारचा परिणाम होत नाही, अशी कुटुंब न्यायालय कायद्यात तरतूद असते. दोन्ही पक्षांचे सुरळीत चालल्याची खात्री पटल्यावर त्यांचा दावा काढण्यात येतो. गरज वाटल्यास विवाह समुपदेशक पक्षकारांच्या घरी भेट देतात.

## परस्पर समजुतीने तोडगा काढण्यावर भर

मात्र जर एकत्र राहणे शक्य नसेल तर त्यांच्या समस्येवर समजुतीने तोडगा काढण्याविषयी विचार केला जातो. परस्परांच्या संमतीने जर काही मार्ग काढता येत असेल तर तशी चर्चा करुन कागदपत्रे तयार करण्यात येतात. कोर्टात हजर राहणे, त्यात वेळ, पैसा, शक्ती व आपले आयुष्य घालविणे हे सर्व टाळण्याकरिता समस्येवर समजुतीने तोडगा काढणे हे दोन्ही पक्षांच्या दृष्टीने हितावह ठरते. ह्यासाठी विवाह समुपदेशक मदत व मार्गदर्शन करतात. न्यायाधीश सुद्धा दोन्ही पक्षांशी बोलणी करतात. न्यायाधिशांच्या मदतीनेच विवाह समुपदेशकांचे काम चालते. मध्यस्थाच्या भूमिकेतून सिनियर वकिल हे खटले तडजोडीने मिटविण्याचे प्रयत्न करतात. (Alternative Dispute Resolution or Mediation)

जर त्यातून काही मार्ग काढणे शक्य दिसत नसेल तर मात्र कोर्टाच्या नियमानुसार त्या दाव्यांची सुनावणी होते. दोन्ही पक्षांची जबानी व उलट तपासणी झाल्यानंतर तसेच साक्षीदारांची जबानी व उलट तपासणी झाल्यावर इतर पुरावे सादर करावयाचे असल्यास ते सादर केले जातात. ह्या सर्वांचा अभ्यास करुन न्यायाधीश त्यांचा निर्णय देतात.

## मनमोकळे वातावरण ठेवण्याचा कटाक्ष

कोर्ट म्हटले की माणूस घाबरतो. 'शहाण्याने कोर्टाची पायरी चढू नये' असे म्हणतात. ह्यासाठीच ज्यांना येथे यावे लागते त्यांना येथे आल्यावर त्यांचे म्हणणे ऐकून घेणे, त्यांना दिलासा देणे हे जरुरीचे ठरते. याचा विचार कुटुंब न्यायालय जरुर करते. शिवाय येथे चालणारे खटले हे बंद दरवाजात (Camera Proceeding) चालतात. पक्षकार आपले म्हणणे मांडतात. गरज असल्यास तज्ज्ञांची मदत (उदा. स्त्री रोग तज्ज्ञ, मानसशास्त्रज्ञ) घेतली जाते. गरज भासल्यास विवाह समुपदेशक स्वतः पक्षकारांच्या घरी किंवा कामाच्या जागी भेट देतात. मुलांशी त्यांच्या कलाने बोलणे केले जाते.

ह्याशिवाय येथे दाखले केलेल्या खटल्यांमधील पालकांना मुला/मुलींना भेटण्याची संधी दिली जाते. त्यासाठी योग्य असे मोकळे वातावरण व योग्य तज्ज्ञांचे मार्गदर्शन या न्यायालयात दिले जाते. त्याकरिता मुलांचे संकुल चालू करण्यात आले आहे. ह्या ठिकाणी मुलांना खेळण्यासाठी जागा व खेळणी देखील आहेत.

खटला कोणत्या कारणासाठी किंवा कोणत्या मागणीसाठी आहे हे पाहून दोन्ही पक्षांच्या निर्णयावरुन तशी कागदपत्रे विवाह समुपदेशक करुन देतात. कुटुंब न्यायालयात जर एका पक्षाने एकतर्फी दावा दाखल केला असला व पुढे समुपदेशकाकडे दोन्ही पक्ष त्यातून मार्ग काढण्यास तयार असले तर त्याच दाव्याचे समजुतीने समझोता काढण्याच्या दाव्यात रुपांतर केले जाते. (Amendment of Petition). म्हणजेच दोन्ही पक्षांना परत दुसरा दावा दाखल करण्याची गरज नसते. शिवाय कायद्यानुसार दावा दाखल केल्यानंतर सहा महिने थांबावे लागते. जर मूळच्या अर्जावरुन त्याचे रुपांतर केले तर हा काळ धरता येतो व पक्षकारांना लवकर निर्णय मिळतो.

कोर्टात बाहेर गावाहून येणाऱ्या स्त्रियांना कोर्टाची केस चालू असेपर्यंत तात्पुरता आश्रय देण्याची सोय कोर्टातर्फे स्वयंसेवी संस्थांची मदत घेऊन केली जाते.

कौटुंबिक समस्या ही केवळ एका व्यक्तीशी वा जोडप्याशी वा कुटुंबाशी निगडीत रहात नसून त्याचा समाजाशी संबंध असतो. कौटुंबिक नाती ही बदलत्या समाजात बदलत चालली आहेत. ही नाती गुंतागुंतीची असतात. ह्यात निर्माण होणाऱ्या समस्याही गुंतागुंतीच्या असतात. ह्यावर उपाय काढणे गरजेचे ठरते. कुटुंब न्यायालये ही आजच्या समाजाची गरज आहे. ही समस्या एवढी प्रचंड व गुंतागुंतीची आहे की त्यावर मार्ग काढण्याची जबाबदारी फक्त न्यायसंस्थेवर सोडली तर ते चुकीचे ठरेल. समाजातल्या प्रत्येक घटकाने त्यासाठी प्रयत्न करायला हवेत. सर्वांच्या सहकार्यानेच हे कामकाज सुरळीतपणे चालविणे व समस्यांवर तोडगा काढणे शक्य आहे.

# कुटुंब न्यायालय

लेखिका : डॉ सुजाता चव्हाण,

Asst.prof.

Advanced centre for women studies

Tata Institute for Social Ssciences

drsujatachavan61@gmail.com



प्रकाशन : ई साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com

esahity@gmail.com

9869674820

प्रकाशन : २३ जुलै २०१६

- विनामूल्य वितरणासाठी उपलब्ध.
- आपले वाचून झाल्यावर आपण हे फ़ॉरवर्ड करू शकता.
- हे ई पुस्तक वेबसाईटवर ठेवण्यापुर्वी किंवा वाचनाव्यतिरिक्त कोणताही वापर करण्यापुर्वी ई-साहित्य प्रतिष्ठानची परवानगी घेणे आवश्यक आहे.

ई साहित्य प्रतिष्ठानची पुस्तके नियमित मिळण्यासाठी VIP सभासद व्हा.

आपल्या दहा मराठी मित्र किंवा नातेवाईकांचे ई मेल पत्ते पाठवा.

आमचा पत्ता : esahity@gmail.com

अधिक माहितीसाठी : www.esahity.com